केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री मत्स्यसंपदा योजनेअंतर्गत अनुसूचित जाती घटकांकरीता सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून वितरीत करणेबाबत

केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०५७७९५)

राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०५७८०१)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२३/प्र.क्र ६१ /अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ३१ मार्च, २०२४

**वाचा :** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०८.१२.२०२३ व ४.०३.२०२४

२) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र.पुरक ११२४/प्र.क्र ४१/पदुम-१४

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत प्रधानमंत्री मत्स्यसंपदा योजनेअंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सुधारीत अंदाजात लेखाशिर्ष २४०५७७९५ केंद्र हिस्सा (३६ टक्के) खाली रु.४०३७.९३ लाख व लेखाशिर्ष २४०५७८०१ राज्य हिस्सा (२४ टक्के) खाली रु.२६९१.६२ लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील परिपत्रकान्वये निधी वितरणाकरीता शासनाने मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत.या अनुषंगाने कृषी व पदुम विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ च्या नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन केंद्र हिस्सा ३६ टक्के साठी लेखाशिर्ष २४०५७७९५ खाली रु.१७५२.९४ लाख व राज्य हिस्सा २४ टक्के साठी लेखाशिर्ष २४०५७८०१ खाली रु. ११६८.६३ लाख असा दोन्ही मिळून रु. २९२१.५७ लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (कृषी व पदुम) विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप

आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिकन्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

४. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. ०८.१२.२०२३ व ०४.०३.२०२४ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. ०८.१२.२०२३ व ०४.०३.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.३६३/व्यय १४ दि. २८.०३.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४०३१६१५३४३१२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.04.03 16:24:48 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

१) अपर मुख्य सचिव (मत्स्यव्यवसाय), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई
२) आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य
३) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग